D:\R.I.A\G.R. Spl-8/2009-248 Chanani samiti Gr.lwp

राष्ट्रपतींचे होमगार्ड व नागरी संरक्षण पदक देण्यासाठी नावांची छाननी करण्यासंदर्भात गठीत केलेली समिती रद्द करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग( विशेष)
शासन शुध्दीपत्रक क्रमांक एचजीएस-२००९/प्र.क्र.२४८/विशा-८,
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक २३ नोव्हेंबर, २००९

पहा:- १) शासन निर्णय क्र.एचजीएस-२००८/प्र.क्र.३०/विशा-८,दिनांक २५-४-२००८
२) शासन शुध्दीपत्रक क्र.एचजीएस-२००८/प्र.क्र.३०/विशा-८,दिनांक २१-५-२००८

प्रस्तावना:- राष्ट्रपतींचे होमगार्ड व नागरी संरक्षण पदक देण्यासाठी नावांची छाननी करण्यासंदर्भात क्रमांक १ वरील दिनांक २४-४-२००८ च्या शासन निर्णयान्वये,कार्यपध्दती व छाननी समिती गठीत करण्यात आलेली आहे. क्रमांक २ वरील दिनांक २५-५-२००८ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये सदर छाननी समितीच्या रचनेत सुधारणा करण्यात आली आहे. तथापि, शासन स्तरावरील गठीत छाननी समितीची बैठक आयोजीत करून केंद्र शासनास विहित मुदतीत प्रस्ताव सादर करण्यास अडचणी येत असल्याचे दिसून येत असल्याने शासन शुध्दीपत्रक दि.२१.५.२००८ अन्वये गठीत केलली छाननी समिती रद्द करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :- शासन शुध्दीपत्रक दि.२१.५.२००८ अन्वये शासन स्तरावर गठीत केलली छाननी समिती याद्वारे रद्द करण्यात येत आहे.

२. होमगार्ड संघटना व नागरी संरक्षण दलातील अधिकारी/ कर्मचारी (वेतनी/ मानसेवी) यांनी केलेल्या उल्लेखनिय कामगिरीच्या अनुषंगाने त्यांच्यामध्ये उत्साह

निर्माण करण्याची पार्श्वभूमी विचारात घेवून, राष्ट्रपतीचे पदक देण्यासंदर्भातील प्रस्ताव नियमित रित्या केंद्र शासनास सादर करण्यासाठी महासमादेशक होमगार्ड तथा संचालक नागरी संरक्षण महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संचालनालयाच्या स्तरावर छाननी समिती गठीत करावी.

३. २६ जानेवारी व १५ ऑगस्ट रोजी राष्ट्रपतींचे पदक दिले जात असल्याने अनुक्रमे ३१ ऑक्टोबर व १५ मे पर्यंत केंद्र शासनास पदक देण्याच्या शिफारशीबाबतचा प्रस्ताव शासनामार्फत सादर करण्याचे केंद्र शासनाचे स्थायी आदेश आहे. सबब परि.२ नुसार गठीत केलेल्या समितीतीच्या सदस्य सचिवांनी समितीच्या बैठकीचे वेळीच आयोजन करुन अनुक्रमे सप्टेंबर व एप्रिल महिन्यातील दुसऱ्या आठवड्यात खालील अ ते ड येथील कागदपत्रासह परिपूर्ण प्रस्ताव शासनास सादर करावेत. केंद्र शासनास शिफारशी सादर करण्यास विलंब झाल्यास अथवा खालील प्रमाणे विहित प्रपत्रात प्रस्ताव सादर न झाल्यास त्याची जबाबदारी छाननी समितीचे सदस्य सचिव यांच्यावर राहील याची कृपया नोंद घ्यावी.

अ) बैठकीसाठी तयार केलेल्या टिप्पणीची प्रत.

ब) होमगार्ड व नागरी संरक्षण संघटनेच्या विहित प्रपत्रातील शिफारशीच्या प्रत्येक उमेदवाराच्या १२ प्रती. यापैकी २ प्रतीवर शाईने स्वाक्षरी असणे आवश्यक आहे.

क) वेतनी अधिका-यांच्या गोपनिय अभिलेखाची समितीच्या सदस्यांनी साक्षांकित केलेली प्रतवारीची प्रत.

ड) छाननी समितीच्या इतिवृत्ताची प्रत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(स.गो.गायकवाड.)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
महासमादेशक, होमगार्ड व संचालक नागरी संरक्षण, म.रा.मुंबई.
पोलीस आयुक्त, मुंबई,
अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, यांचे प्रशासिक अधिकारी/ स्वीय सहाय्यक.
प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहाय्यक
उप सचिव , विशा-८, गृह विभाग, मंत्रालय. यांचे स्वीय सहाय्यक.
संगणक समन्वयक, गृह विभाग, मंत्रालय, गृह विभागाच्या वेबसाइटवर प्रस्तुत शासन निर्णयाचे कृपया अवतरण करावे व याबाबत केलेल्या कार्यवाहीबाबत कार्यासनास अवगत करावे.
सर्व जिल्हा समादेशक, होमगार्ड .
सर्व नागरी संरक्षण क्षेत्रीय कार्यालय, संचालनालयामार्फत.